विशेष व्याघ्र संरक्षण दलाच्या अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यांकरीता निधी

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०४.२५/प्र.क्र.९९/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १३ मे, २०२५.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थ-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र. ०१/०१/२०२५-२६, दिनांक ०१.०४.२०२५.

प्रस्तावना :-

केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दिनांक १८.१२.२०१५ च्या पत्रान्वये "व्याघ्र प्रकल्प" या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत अनावर्ती खर्चाच्या कार्यबाबींकरीता ६०:४० अशी हिस्सा पद्धती सूचित करण्यात आली. सुधारीत हिस्सा पध्दतीनुसार "व्याघ्र प्रकल्प" या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत अनावर्ती खर्चाच्या कार्यबाबींकरीता ६०% केंद्र हिस्सा व त्यास अनुरुप ४० % राज्य हिस्सानुसार निधी वितरीत करणे अपेक्षित आहे. त्यामुळे विशेष व्याघ्र संरक्षण दलात कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वेतनाचा ४० % भार (अनावर्ती बाब) उचलण्याची जबाबदारी ही राज्य शासनाची देखील आहे.

२. "व्याघ्र प्रकल्प" या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत वार्षिक प्रवर्तन अहवालास (APO) केंद्र शासनाकडून मंजुरी मिळण्याकरीता लागणारा कालावधी लक्षात घेता सन २०२५-२६ मध्ये विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे वेतनाकरीता आवश्यक आलेला रु. १६४२.०४ लक्ष निधी आवश्यक असून त्यापैकी राज्य हिस्सांतर्गत सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील ६ महिन्यांच्या वेतनाकरिता आवश्यक असलेला रु. ८२१.०२ लक्ष निधी राज्य हिस्सा ४०% (२४०६-ए१०२) या लेखाशिर्षातील ०१-वेतन उद्दिष्ट शिर्षातून उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुसार पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सन २०२५-२६ च्या वेतनाकरीता आवश्यक आलेला रु. १६४२.०४ लक्ष निधी पैकी राज्य हिस्सा ४०% (२४०६-ए१०२) या लेखाशिर्षातील ०१-वेतन उद्दिष्ट शिर्षातर्गत सन २०२५-२६ करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून **रु. ८२१.०२ लक्ष** निधी खर्च करण्यास सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सन २०२४-२५ च्या वेतनावर होणारा खर्च व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत लेखाशीर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन,

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए १०२) अंतर्गत ०१-वेतन या उद्दिष्टांतर्गत सन २०२५-२६ करीता अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने व राज्य शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

ई) सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून केंद्र हिस्स्याचा निधी प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करण्यात यावी.

उ) वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थ-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक:- ३१६७/व्यय-१०, दिनांक :- २९.०४.२०२५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१३१२४४२६०४९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY CHANDRAKANT DHAGE

Digitally signed by UDAY CHANDRAKANT DHAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=d50c7e8b1126d276bbe49105f9d24fff67dc9032e4afab15f5d0d94a0ea6cf5a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=097E903F6E5707A0A9A3CDAEBE40C9235E8FDA1EE2C8C4EA7713D6497937DCED, cn=UDAY CHANDRAKANT DHAGE
Date: 2025.05.13 12:45:36 +05'30'

**(उदय ढगे)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
८. उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
९. कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
११. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********